**नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग निर्मिती व तद्नुषंगिक कामासाठी लॅण्ड पुलिंग योजनेद्वारे जमीन प्राप्त करणे व विकसित जमिनीच्या स्वरुपात मोबदला प्रदान करणे व तद्नुषंगिक बाबींस सुधारित मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खाक्षेस-२०१६/प्र.क्र.२५१/रस्ते-८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ जानेवारी, २०१७.

**वाचा :** १. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.खाक्षेस-२०१६/प्र.क्र.२५१/रस्ते-८, दिनांक : ५ जुलै, २०१६
२. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.खाक्षेस-२०१६/प्र.क्र.३११/रस्ते-८, दिनांक : ५ जुलै, २०१६
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग दिनांक : २ एप्रिल, १९७३

**प्रस्तावना :-**

नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग, जोडरस्ते व त्यावरील नवनगरांच्या आखणीमध्ये अंतर्भूत जमिनी भूधारकांकडून स्वेच्छेने, संमतीने, विना संघर्ष व सत्वर प्राप्त होण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णय दिनांक ५ जुलै, २०१६ अन्वये नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग निर्मिती व तद्नुषंगिक कामासाठी लॅण्ड पुलिंग योजनेद्वारे जमीन प्राप्त करणे व विकसित जमिनीच्या स्वरुपात मोबदला प्रदान करणे व तद्नुषंगिक बाबींस मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णय दिनांक ५ जुलै, २०१६ अन्वये नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग निर्मिती व तद्नुषंगिक कामासाठी लॅण्ड पुलिंग योजनेंतर्गत भूधारकांसाठी भागीदारी / देय व अनुज्ञेय लाभामध्ये बदल करण्यासाठी मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यात आली आहे.

०२. नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हानिहाय भूधारक, लोकप्रतिनिधी व प्रशासकीय अधिकारी यांच्या कार्यशाळा / बैठका घेण्यात आल्या व त्यामध्ये शासनाच्या धोरणाची माहिती देण्यात आली. भूधारक आणि लोकप्रतिनिधी यांनी या योजनेंतर्गत अनुज्ञेय लाभामध्ये काही सुधारणा करण्याच्या सूचना केल्या आहेत. त्यानुषंगाने या प्रकल्पासाठी जमीन एकत्रीकरण योजनेत स्वेच्छेने सहभागी होणाऱ्या भूधारकांसाठी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयाप्रमाणे देय व अनुज्ञेय लाभामध्ये काही सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमितीने दिनांक ३ नोव्हेंबर, २०१६ रोजीच्या बैठकीमध्ये यासंदर्भात सर्व बाबींवर साकल्याने विचार विनिमय करून संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयाप्रमाणे देय व अनुज्ञेय लाभामध्ये सुधारणा करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग, जोडरस्ते व त्यावरील नवनगरे यांचे आखणीमध्ये अंतर्भूत जमिनी भूधारकांकडून स्वेच्छेने, संमतीने, विना संघर्ष व सत्वर प्राप्त होण्यासाठी, अशा भूधारकांसाठी त्यापोटी देय मोबदल्याबाबत आणि त्यानुषंगिक लाभांसंदर्भात खालील नमूद बाबींना मान्यता देण्यात येत आहे :-

**१. विकसित बिनशेती भूखंडाच्या स्वरुपात परतावा :-**

१.१ **हंगामी बागायत जमीन :-**

अ) द्रुतगती मार्ग व जोडरस्ते यांच्या आखणीमध्ये समाविष्ट हंगामी बागायत जमिनीचा संवर्ग समाविष्ट करण्यात येत आहे. अशा जमिनीकरीता विकसित बिनशेती भूखंडाच्या स्वरुपात परतावा जिरायत जमिनीप्रमाणे (म्हणजेच २५%) अनुज्ञेय राहील.

| अ. क्र. | जमिनीचा तपशील | भूधारकांना परत द्यावयाच्या निव्वळ विकासयोग्य क्षेत्र (टक्केवारी) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | द्रुतगती मार्ग व जोडरस्ते यांचे आखणीमध्ये समाविष्ट जमिनी | |
| क | हंगामी बागायत जमीन | २५% |

(उदा. जसे की प्रती १०,००० चौ.मी. क्षेत्राकरीता २५% प्रमाणे २,५०० चौ.मी. निव्वळ विकासयोग्य क्षेत्र अनुज्ञेय राहील.)

ब) **हंगामी बागायत जमिनीची व्याख्या** :- ज्या जमिनीमध्ये एका वर्षात दोन (२) पिके घेण्यासंदर्भात सिंचनाची सोय आहे, अशा सक्षम महसूल प्राधिकरणाने निश्चित करावयाच्या हंगामी बागायती जमिनी व त्यामध्ये फळबागा / बारमाही बागायती जमिनींव्यतिरिक्त अन्य हंगामी बागायती जमिनींचा समावेश असेल.

१.२ **बिनशेती दर्जा असलेल्या भूखंडापोटी देय मोबदला :-**

अ) प्रकल्पाच्या अधिसूचित आखणीमध्ये समाविष्ट असलेल्या ज्या भूधारकांनी महाराष्ट्र महामार्ग (सुधारणा) अधिनियम, २०१६ च्या कलम १९ग च्या उप-कलम (१) प्रमाणे प्राथमिक अधिसूचना प्रसिद्धीच्या दिनांकापूर्वी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ४२ प्रमाणे जमिनीच्या अकृषक उपयोगासाठी जिल्हाधिकारी यांचेकडून अकृषक परवानगी प्राप्त केली आहे, अशा भूधारकांना त्यांनी रहिवासी / वाणिज्य प्रयोजनासाठी धारण केलेल्या अशा अकृषक भूखंडाच्या क्षेत्राच्या बदल्यात अकृषक रेखांकनात मंजूर असलेल्या क्षेत्राइतका जमीन एकत्रीकरण योजनेंतर्गत रहिवासी / वाणिज्य प्रयोजनासाठी विकसित बिनशेती भूखंड अनुज्ञेय राहील.

ब) भूधारकास अशा अकृषक रेखांकनातील खुल्या जागा, सुविधा क्षेत्र, रस्त्याखालील क्षेत्र इत्यादीकरीता राखीव ठेवलेल्या जागा विना मोबदला महामंडळास हस्तांतरित करणे बंधनकारक राहील. तसेच भूधारकास महाराष्ट्र महामार्ग (जमीन एकत्रीकरण योजना तयार करणे व तिची अंमलबजावणी करणे) नियम, २०१६ च्या नियम २१ प्रमाणे शासनाने नवनगराच्या पायाभूत सुविधांच्या परिरक्षणासाठी वेळोवेळी आकारलेला उपभोक्ता आकार लागू राहतील.

१.३ **भोगवटादार वर्ग-२ (दोन) भूधारणा प्रकारातील समाविष्ट जमिनीपोटी अनुज्ञेय विकसित बिनशेती भूखंड** :-

अ) जमीन हस्तांतरण हक्क निर्बंधास अधीन असलेल्या जमिनींबाबत भूसंपादन मोबदला परीगणित करण्याबाबतचा संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णय विचारात घेता, भूधारकांना भोगवटादार वर्ग-२ (दोन) भूधारणा प्रकारातील जमिनीपोटी, जमीन एकत्रीकरण योजनेंतर्गत भोगवटादार वर्ग-१ (एक) जमिनींसंदर्भातील देय मोबदल्याच्या ९०% मोबदला क्षेत्राइतका विकसित बिनशेती भूखंड अनुज्ञेय राहील.

ब) शासनाच्या विविध कायद्याखाली धारण / प्रदान / पुनर्प्रदान केलेल्या जमिनीबाबतच्या भूधारणा पद्धती विचारात घेऊन, भूधारकांना जिरायत, हंगामी बागायत व बागायत जमिनीसाठी द्रुतगती मार्ग व जोडरस्ते यांच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनीपोटी अनुज्ञेय लाभ या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ट-अ” प्रमाणे व नवनगराच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनीपोटी अनुज्ञेय लाभ या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ट-ब” प्रमाणे नियोजित नवनगरामध्ये प्रती १०,००० चौ.मी. करीता एक (१) अनुज्ञेय चटई क्षेत्र निर्देशांकासहित विकसित बिनशेती जमीन / भूखंड अनुज्ञेय व देय राहील.

१.४ संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील परिच्छेद १ मध्ये विकसित बिनशेती भूखंडाच्या स्वरुपात परताव्याबाबतच्या उर्वरीत तरतुदी हंगामी बागायत जमिनी, बिनशेती दर्जा असलेले भूखंड व भोगवटादार वर्ग-२ (दोन) भूधारणा प्रकारातील जमिनीस लागू राहतील.

**२. लगतच्या जिल्ह्यामध्ये विकसित बिनशेती भूखंड वाटप :-**

२.१ एखाद्या जिल्ह्यामध्ये नवनगरासाठी जागा उपलब्ध होत नसल्यास अथवा त्या जिल्ह्यातील भूधारकांना देय विकसित बिनशेती भूखंडाच्या प्रमाणात जागा अपुरी होत असल्यास, अशा जिल्ह्यातील भूधारकांना या प्रकल्पाच्या अधिसूचित आखणीमध्ये समाविष्ट असलेल्या लगतच्या जिल्ह्यातील नवनगरांमध्ये विकसित बिनशेती भूखंड वाटप करण्यात येईल.

२.२ लगतच्या जिल्ह्यातील नवनगरांतील जागांची उपलब्धता विचारात घेऊन, त्या जिल्ह्यातील भूधारकांची गरज भागविल्यानंतर व त्याठिकाणी शिल्लक विकसित बिनशेती भूखंड वाटपासाठी उपलब्ध होत असल्यास, अशा भूखंडांच्या वाटपाबाबत भूधारकांचे जिल्हा पसंतीक्रम प्राप्त करण्यात येतील.

२.३ अशा लगतच्या जिल्ह्यांमध्ये भूधारकांना त्यांच्या मागणी अर्जातील पसंतीक्रमाच्या आधारे विकसित बिनशेती भूखंडाचे खुल्या सोडतीव्दारे (लॉटरी पद्धतीने) वाटप करण्यात येईल.

**३. भूखंड पुनर्खरेदी :-**

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील परिच्छेद १.६ मधील भूखंड पुनर्खरेदीमध्ये पुढील बाबी समाविष्ट करण्यात येत आहेत.

अ) नवनगरामध्ये विकसित बिनशेती भूखंड वाटपावेळी निश्चित करावयाच्या बाजारमूल्यासाठी भूसंपादन अधिनियम, २०१३ प्रमाणे निर्गमित केलेली महसूल व वन विभाग, अधिसूचना, दिनांक २६/०५/२०१५ प्रमाणे गुणांक विचारात घेणे आवश्यक आहे. त्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ११३ क प्रमाणे -नवनगरे◦ म्हणून अधिसूचना प्रसिद्धीच्या दिनांकास, अशा जमीन एकत्रीकरण योजनेंतर्गत विकसित करावयाच्या नवनगरामध्ये अंतर्भूत क्षेत्राचा सदर अधिसूचनेपूर्वी, उक्त दिनांक २६/०५/२०१५ रोजीच्या अधिसूचनेतील अनुसूचीनुसार ज्या क्षेत्रामध्ये समावेश होतो, त्या क्षेत्रास लागू असणारा घटक गुणांक म्हणून विचारात घ्यावा.

ब) द्रुतगती मार्ग व नवनगरांच्या आखणीमध्ये समाविष्ट गावासाठी शिघ्रसिद्ध गणकामध्ये बिनशेती भूखंडाचा मूल्य दर हा त्या भूखंडाच्या स्थानाप्रमाणे (उदा. गावठाण, हायवे लगत, मुख्य रस्त्यालगत व तत्सम) वेगवेगळा नमूद केला आहे. उक्त नवनगरांमध्ये सर्व पायाभूत सुविधा शासन / महामंडळामार्फत टप्प्याटप्प्याने उपलब्ध केल्या जाणार आहेत. त्यामुळे नवनगरांमध्ये सर्व पायाभूत सुविधा उपलब्ध असलेल्या विकसित बिनशेती भूखंडाचे मूल्य निश्चित करताना सुसूत्रता राहणे आवश्यक आहे. त्यासाठी अशा नवनगरांमध्ये समाविष्ट गावांसाठी / क्षेत्रांसाठी त्यावेळी शिघ्रसिद्ध गणकामध्ये नमूद असलेल्या अथवा नमूद नसल्यास, त्या गावालगतच्या / क्षेत्रालगतच्या गावामध्ये / क्षेत्रामध्ये असलेल्या विकसित बिनशेती भूखंडाचे नवनगर अधिसूचित केल्याचा दिनांकास शिघ्रसिद्ध गणकाप्रमाणे नमूद असलेले बाजारमूल्य विचारात घेऊन भूखंड पुनर्खरेदी दर निश्चितीबाबत अधिसूचना शासनातर्फे प्रसिद्ध करण्यात येईल.

**४. वार्षिक अनुदान :-**

४.१ जमिनीच्या प्रतवारीनुसार जमिनीचा ताबा शासनाकडे दिल्यानंतर भूधारकांना प्रती हेक्टरी प्रती वर्षी (दरवर्षी १०% वाढ देऊन) पुढील दहा (१०) वर्षासाठी अनुज्ञेय वार्षिक अनुदान पुढीलप्रमाणे देय राहील.

| अ.क्र. | वार्षिक अनुदान (दर वर्षी १०% वाढ देऊन) (रुपये) | | | |
|---|---|---|---|---|
| | | जिरायत जमीन | हंगामी बागायत जमीन | बागायत जमीन |
| १ | प्रती हेक्टरी | ७५,०००/- | १,१२,५००/- | १,५०,०००/- |
| २ | प्रती एकर | ३०,०००/- | ४५,०००/- | ६०,०००/- |

४.२ संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ मधील वार्षिक अनुदानाबाबतच्या उर्वरित तरतुदी लागू राहतील.

**५. तुकडेबंदी कायद्यानुसार किमान प्रमाणभूत क्षेत्रापेक्षा कमी जमीन आखणीबाहेर शिल्लक राहत असल्यास, अशी जमीन, जमीन एकत्रीकरण योजनेद्वारे / भूसंपादनाद्वारे प्राप्त करणे :-**

५.१ भूधारकांची संमती असल्यास, त्यांच्या जमिनींचा प्रकल्पाच्या अधिसूचित आखणीबाहेरील उर्वरित भाग जर महाराष्ट्र धारण जमिनीचे तुकडे पाडण्यास प्रतिबंध करण्याबाबत व त्याचे एकत्रीकरण करण्याबाबत अधिनियम, १९४७ प्रमाणे किमान प्रमाणभूत क्षेत्रापेक्षा कमी असल्यास, अशा जमिनी, जमीन एकत्रीकरण योजनेंतर्गत / भूसंपादन कायद्याप्रमाणे / शासनाच्या धोरणाप्रमाणे प्राप्त करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५.२ अशा जमिनींचा विनियोग महाराष्ट्र महामार्ग (सुधारणा) अधिनियम २०१३ चे कलम ६३अ मध्ये नमूद जमीन विल्हेवाट नियमाप्रमाणे करावा.

६. संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील उर्वरित सर्व तरतुदी कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०४१४४६२८७३१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Dattatraya Joshi

Digitally signed by Ramchandra Dattatraya Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=P W D, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a652e9f280742859802a83b556a9f74dc3563d2f7f6c6ec8ad7583e085375954, cn=Ramchandra Dattatraya Joshi
Date: 2017.01.04 14:49:26 +05'30'

**( रा.द.जोशी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत -**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (कृषि व पदुम विभाग), मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव (विधि व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव (सहकार विभाग), मंत्रालय, मुंबई
१५) प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई
१६) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.र.वि. महामंडळ, वांद्रे, मुंबई-५०
१९) विभागीय आयुक्त, कोकण / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर

२०) जिल्हाधिकारी, ठाणे / नाशिक / अहमदनगर / औरंगाबाद / जालना / बुलढाणा / वाशिम / अमरावती / वर्धा / नागपूर

२१) सर्व मंत्रालयीन विभाग

२२) निवड नस्ती (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

## सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्रमांक : खाक्षेस-२०१६/प्र.क्र.२५१/रस्ते-८, दिनांक : ०४ जानेवारी, २०१७ सोबतचे

## परिशिष्ट-अ

## (द्रुतगती मार्ग व जोडरस्ते यांच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनीपोटी अनुज्ञेय लाभ)

| अ. क्र. | भूधारणा प्रकार / जमिनीचा प्रकार | भूधारकांना परत द्यावयाच्या निव्वळ विकास योग्य क्षेत्राचे सूत्र (प्रती १०,००० चौ.मी. करीता) | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | जिरायत जमीन | | हंगामी बागायत जमीन | | बागायत जमीन | |
| | | टक्केवारी | क्षेत्र (चौ.मी) | टक्केवारी | क्षेत्र (चौ.मी) | टक्केवारी | क्षेत्र (चौ.मी) |
| १ | भोगवटादार वर्ग-१ | २५ | २,५०० | २५ | २,५०० | ३० | ३,००० |
| २ | भोगवटादार वर्ग-२ - कुळ कायद्याप्रमाणे धारण केलेल्या जमिनी | | | | | | |
| अ | कुळ कायद्याप्रमाणे कुळांनी जमीन मालक म्हणून धारण केलेल्या जमिनी (नियंत्रित सत्ता प्रकार) | २२.५ | २,२५० | २२.५ | २,२५० | २७ | २,७०० |
| ब | कुळ कायद्याप्रमाणे धारण जमिनीमध्ये कुळ व मालक हितसंबंध प्रस्थापित होत असल्यास. | | | | | | |
| | ग्रामीण क्षेत्राकरीता — जमीन मालक : ४०% | १० | १,००० | १० | १,००० | १२ | १,२०० |
| | ग्रामीण क्षेत्राकरीता — कुळ : ६०% | १५ | १,५०० | १५ | १,५०० | १८ | १,८०० |
| | नगरपालिका क्षेत्राकरीता — जमीन मालक : २५% | ६.२५ | ६२५ | ६.२५ | ६२५ | ७.५ | ७५० |
| | नगरपालिका क्षेत्राकरीता — कुळ : ७५% | १८.७५ | १,८७५ | १८.७५ | १,८७५ | २२.५ | २,२५० |
| ३ | भोगवटादार वर्ग-२ - विविध सत्ता प्रकार निर्मुलन कायद्याखाली पुनर्प्रदान केलेल्या जमिनी (Land regranted under the various Tenure Abolition Laws) | २२.५ | २,२५० | २२.५ | २,२५० | २७ | २,७०० |
| ४ | भोगवटादार वर्ग-२ - भूमिधारी यांनी धारण केलेल्या जमिनी | २२.५ | २,२५० | २२.५ | २,२५० | २७ | २,७०० |
| ५ | भोगवटादार वर्ग-२ -शासनाने नवीन शर्त / नवीन व अविभाज्य सत्ता प्रकार / नियंत्रित सत्ता प्रकार म्हणून प्रदान केलेल्या जमिनी | २२.५ | २,२५० | २२.५ | २,२५० | २७ | २,७०० |
| ६ | भोगवटादार वर्ग-२ -शासनाने कुळ कायदा / कमाल शेतजमीन धारणा कायद्याखाली प्रदान केलेल्या अतिरिक्त जमिनी | २२.५ | २,२५० | २२.५ | २,२५० | २७ | २,७०० |
| ७ | वन हक्क कायद्याखाली कसवणूक हक्कासाठी दिलेल्या जमिनी | १२.५ | १,२५० | १२.५ | १,२५० | १५ | १,५०० |
| ८ | भूदान कायद्याप्रमाणे प्रदान केलेल्या जमिनी | | | | | | |
| | भूदान यज्ञ समिती : ४०% | १० | १,००० | १० | १,००० | १२ | १,२०० |
| | जमीन धारक : ६०% | १५ | १,५०० | १५ | १,५०० | १८ | १,८०० |

**सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्रमांक : खाक्षेस-२०१६/प्र.क्र.२५१/रस्ते-८,**
**दिनांक : ०४ जानेवारी, २०१७ सोबतचे**

## परिशिष्ट-ब

**(नवनगरांच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनीपोटी अनुज्ञेय लाभ)**

| अ. क्र. | भूधारणा प्रकार / जमिनीचा प्रकार | | भूधारकांना परत द्यावयाच्या निव्वळ विकास योग्य क्षेत्राचे सूत्र (प्रती १०,००० चौ.मी. करीता) | |
|---|---|---|---|---|
| | | | टक्केवारी | क्षेत्र (चौ.मी) |
| १ | भोगवटादार वर्ग-१ | | ३० | ३,००० |
| २ | भोगवटादार वर्ग-२ - कुळ कायद्याप्रमाणे धारण केलेल्या जमिनी | | | |
| अ | कुळ कायद्याप्रमाणे कुळांनी जमीन मालक म्हणून धारण केलेल्या जमिनी (नियंत्रित सत्ता प्रकार) | | २७ | २,७०० |
| ब | कुळ कायद्याप्रमाणे धारण जमिनीमध्ये कुळ व मालक हितसंबंध प्रस्थापित होत असल्यास. | | | |
| | ग्रामीण क्षेत्राकरीता | जमीन मालक : ४०% | १२ | १,२०० |
| | | कुळ : ६०% | १८ | १,८०० |
| | नगरपालिका क्षेत्राकरीता | जमीन मालक : २५% | ७.५ | ७५० |
| | | कुळ : ७५% | २२.५ | २,२५० |
| ३ | भोगवटादार वर्ग-२ - विविध सत्ता प्रकार निर्मुलन कायद्याखाली पुनर्प्रदान केलेल्या जमिनी (Land regranted under the various Tenure Abolition Laws) | | २७ | २,७०० |
| ४ | भोगवटादार वर्ग-२ - भूमिधारी यांनी धारण केलेल्या जमिनी | | २७ | २,७०० |
| ५ | भोगवटादार वर्ग-२ -शासनाने नवीन शर्त / नवीन व अविभाज्य सत्ता प्रकार / नियंत्रित सत्ता प्रकार म्हणून प्रदान केलेल्या जमिनी | | २७ | २,७०० |
| ६ | भोगवटादार वर्ग-२ -शासनाने कुळ कायदा / कमाल शेतजमीन धारणा कायद्याखाली प्रदान केलेल्या अतिरिक्त जमिनी | | २७ | २,७०० |
| ७ | वन हक्क कायद्याखाली कसवणूक हक्कासाठी दिलेल्या जमिनी | | १५ | १,५०० |
| ८ | भूदान कायद्याप्रमाणे प्रदान केलेल्या जमिनी | | | |
| | भूदान यज्ञ समिती : ४०% | | १२ | १,२०० |
| | जमीन धारक : ६०% | | १८ | १,८०० |

*****